**निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास या योजनांतर्गत श्री.चौरंगीनाथ या निसर्ग पर्यटन स्थळावर कार्यरत असलेल्या ६ अस्थायी पदांना सन २०२५-२६ मध्ये पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२५/प्र.क्र.२६/३/फ-९**

**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**

**दिनांक :- ०५ मार्च, २०२५**

**वाचा :-**

१. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.१३.०९.२०१९
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.२१.०९.२०२१
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २१.०२.२०२४
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. २०२४/प्र.क्र.२२/३/फ-९, दि. ७.०३.२०२४
५. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०६.०९.२०२४
६. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण- २०२४/प्र.क्र.२२/१३/फ-९, दि. २०.०९.२०२४
७. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०३.०३.२०२५
८. उप वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-३ /योजनेत्तर/प्र.क्र.४३ (२४-२५)/५६७/२५-२६, दिनांक १४.०२.२०२५

**शासन निर्णय :-**

उप वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वाचा येथील क्र.८ अन्वये निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास या योजनांतर्गत श्री.चौरंगीनाथ या निसर्ग पर्यटन स्थळावर कार्यरत असलेल्या ६ अस्थायी पदांना सन २०२५-२६ या आर्थिक वर्षामध्ये पुढे चालु ठेवण्यास मंजूरी प्रदान करण्याबाबत विनंती केलेली आहे. वाचा येथील क्र.२ च्या सुधारीत आकृतीबंधाचे पुनर्गठनप्रमाणे वन विभागाच्या एकूण २६५७३ पदांमध्ये या योजनेतील ६ पदांचा समावेश आहे.

यापूर्वी वित्त विभागाच्या वाचा क्र.३ व ५ येथील नमूद शासन निर्णयास अनुसरुन महसूल व वन विभागच्या वाचा येथील क्र.४ व ६ च्या शासन निर्णयान्वये निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास या योजनांतर्गत श्री.चौरंगीनाथ या निसर्ग पर्यटन स्थळावर कार्यरत असलेल्या ६ अस्थायी पदांना सन २०२४-२५ मध्ये दिनांक ०१.०३.२०२४ ते २८.०२.२०२५ पर्यंत चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात आली आहे.

वित्त विभागाच्या वाचा येथील क्र.७ च्या दिनांक ०३.०३.२०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापुर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृत्तीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२५ ते ३१.०८.२०२५ पर्यंत अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत.

त्यानुसार निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास या योजनांतर्गत श्री.चौरंगीनाथ या निसर्ग पर्यटन स्थळावर कार्यरत असलेल्या ६ अस्थायी पदांना दि. ०१.०३.२०२५ ते ३१.०८.२०२५ पर्यंत चालू ठेवण्यास सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर मुदतवाढ वाचा येथील क्र.१ व २ च्या शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या आकृत्तीबंधात या पदांचा समावेश आहे या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

सदर ६ पदांचा वेतन व भत्यांचा खर्च मुख्य शिर्ष- २४०६, वनिकरण व वन्यजीवन, ८०० (०२) इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत, राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०६) इको टुरिझम (राज्य) (२४०६-२२९५) ०१-वेतन या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या वित्तीय वर्षांत उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा व मान्य होणाऱ्या अर्थसंकल्पीय तरतुदींच्या मर्यादेतच उपरोक्त पदांसाठी खर्च करावा. सदर कालावधीमध्ये त्यांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेवून सुधारीत आकृत्तीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे. यानंतर सुधारीत आकृत्तीबंध निश्चित करण्याकरीता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही.

प्रस्तूत शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्रमांक- पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०३.०३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३०५१५२५०१९७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK VIJAY HOSHING

Digitally signed by VIVEK VIJAY HOSHING
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=7e3227e15fe5debe28837d6e68d17c1f6e96d1a6dc7f27bc7e0f3ec07bbdfab8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3B1AFE499C80878329FBB017E4922F7356CC5EDC76102E8FF88C7B9A67A322D9, cn=VIVEK VIJAY HOSHING
Date: 2025.03.05 15:26:20 +05'30'

**(विवेक होशिंग)**

**उप सचिव (वने), महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), कोल्हापूर
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर.
६. महालेखापाल - १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
७. वित्त विभाग, व्यय-१०/वित्तिय सुधारणा- १ कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
८. कार्यासन अधिकारी फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
९. कक्ष अधिकारी ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
१०. फ-९ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)

**शासन निर्णय क्रमांक:- संकीर्ण-२०२५/प्र.क्र.२६/३/फ-९, दिनांक ०५ मार्च, २०२५**

**सोबतचे विवरणपत्र**

**(दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक ३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली पदे)**

| अ.क्र. | पदनाम | एकूण |
|---|---|---|
| १ | वनरक्षक | २ |
| २ | पहारेकरी | ४ |
| | एकूण:- | ६ |

VIVEK VIJAY HOSHING

Digitally signed by VIVEK VIJAY HOSHING
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=7e3227e15fe5debe28837d6e68d17c1f6e96d1a6dc7f27bc7e0f3ec07bbdfab8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3B1AFE499C80878329FBB017E4922F7356CC5EDC76102E8FF88C7B9A67A322D9, cn=VIVEK VIJAY HOSHING
Date: 2025.03.05 15:26:39 +05'30'

**(विवेक होशिंग)**

**उप सचिव (वने), महाराष्ट्र शासन**

*****************